**मा. उच्च न्यायालयाचे सेवा निवृत्त न्यायाधीश श्री. एम.जी. गायकवाड यांच्या अध्यक्षतेखाली नेमलेल्या चौकशी समितीस मुदत वाढ देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : जहिया २०१२/प्र.क्र.८० (भाग-७)/ का-१६**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई
दिनांक : १४ जुलै , २०१५

वाचा :- १. शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्रमांक -जहिया २०१२/प्र.क्र.८० (भाग-४)/ का-१६, दिनांक १५.४.२०१४

२. महाराष्ट्र शासन, राजपत्र असाधारण भाग चार-अ, असाधारण क्रमांक ६४, अधिसूचना आदिवासी विकास विभाग,क्रमांक जहिया २०१२/प्र.क्र. ८० ( भाग-४ ), दिनाक २९.४.२०१४

३. शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, जहिया २०१२/प्र.क्र.८० (भाग-७) का-१६, दिनांक २०.११.२०१४

४. शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, जहिया २०१२/प्र.क्र.८० (भाग-७)/ का-१६, दिनांक १३.४.२०१५

५. सदस्य सचिव, चौकशी समिती, नाशिक यांचे क्रमांक ICO/५१७ of २०१५ , दि.१६.६.२०१५

प्रस्तावना :

जनहित याचिका क्र.१५३/२०१२ च्या अनुषंगाने क्रमांक १ येथील शासन निर्णय , आदिवासी विकास विभाग, दिनांक १५ एप्रिल,२०१४ अन्वये श्री. एम.जी. गायकवाड, सेवा निवृत्त न्यायाधीश, मा. उच्च न्यायालय यांच्या अध्यक्षतेखाली ५ सदस्यीय चौकशी समिती गठित करण्यात आली आहे. सदर चौकशी समितीस दिनांक १५.१०.२०१४ च्या पुढे वरील संदर्भ क्र. ३ च्या दिनांक २०.११.२०१४ च्या शासन निर्णयान्वये ६ महिने मुदत वाढ देण्यात आली होती व त्यानंतर वरील संदर्भ क्रमांक ४ च्या दिनांक १३.४.२०१५ च्या शासन निर्णयान्वये दिनांक १५.४.२०१५ पासून पुढे आणखी ३ महिने मुदत वाढ देण्यात आलेली आहे. सदर समितीची मुदत दिनांक १५.७.२०१५ रोजी संपुष्टात येत असल्याने व चौकशी समितीस अद्याप चौकशीच्या अनुषंगाने बरीच कामे करावयाची असल्याने सदस्य सचिव, चौकशी समिती, नाशिक यांनी त्यांच्या संदर्भ क्र.५ येथील दिनांक १६.६.२०१५ च्या पत्रान्वये चौकशी समितीस दिनांक १५.७.२०१५ च्या पुढे आणखी ६ महिन्याच्या कालावधीकरीता मुदतवाढ देणेबाबत कळविले असल्याने त्यानुषंगाने सदर चौकशी समितीस मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मा. श्री. एम.जी. गायकवाड, सेवा निवृत्त न्यायाधीश, मा. उच्च न्यायालय यांच्या अध्यक्षतेखाली नेमलेल्या चौकशी समितीस शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्रमांक - जहिया २०१२/प्र.क्र.८० (भाग-७ )/ का-१६, दिनांक १३.४.२०१५ अन्वये ३ महिन्याची मुदत वाढ देण्यात आलेली आहे. सदर समितीची मुदत दिनांक १५.७.२०१५ रोजी संपृष्टात येत आहे. सदस्य सचिव, चौकशी समिती, नाशिक यांनी समितीस मुदतवाढ देण्याबाबत केलेली विनंती विचारात घेऊन सदर समितीस दिनांक १५.७.२०१५ पासून पुढील ६ महिन्याच्या कालावधीकरीता या शासन निर्णयान्वये मुदत वाढ देण्यात येत आहे.

सदर चौकशी समितीने करावयाची कामे, तिची कार्यकक्षा, तिच्या जबाबदा-या व कर्तव्ये त्याचप्रमाणे अटी व शर्ती ( Terms of Reference ) या संदर्भातील दिनांक १५.४.२०१४ च्या शासन निर्णयामध्ये नमूद केल्याप्रमाणेच राहतील.

सदर समितीसाठी होणारा खर्च मागणी क्र.टि-५, २२२५-अनुसूचित जाती,अनुसूचित जमाती व इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना -०२, अनुसूचित जमातीचे कल्याण -७९६, आदिवासी क्षेत्र उपयोजना (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना (०१) (०१) आदिवासी विकास आयुक्तालय ( २२२५-१३९३ ) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व सदर खर्च मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक २२४/व्यय-१४, दिनांक १२.७.२०१५ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www. maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१५०७१३१६०३०६२२२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

Laxmikant G Dhoke

Digitally signed by Laxmikant G Dhoke
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Laxmikant G Dhoke
Date: 2015.07.14 14:05:03 +05'30'

**( ल. गो. ढोके )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपालांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. मंत्री ( आवि ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

४. मा. राज्यमंत्री ( आवि ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
६. मा. श्री. एम.जी.गायकवाड, सेवानिवृत्त न्यायाधीश, मा. उच्च न्यायालय, मुंबई तथा अध्यक्ष, चौकशी समिती, नाशिक
७. अपर मुख्य सचिव, (गृह ), मंत्रालय, मुंबई
८. अपर मुख्य सचिव (वित्त ) विभाग, मंत्रालय, मुंबई
९. प्रधान सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
१०.प्रधान सचिव ( विधी व न्याय विभाग ) मंत्रालय, मुंबई
११.प्रधान सचिव (उर्जा ) मंत्रालय, मुंबई
१२.सचिव ( आदिवासी विकास ), मंत्रालय, मुंबई
१३.सचिव, (लेखा व कोषागारे), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१४.पोलीस महासंचालक, पोलीस महासंचालकांचे कार्यालय, कुलाबा, मुंबई
१५.श्री. बिपीन श्रीमाळी, (भाप्रसे), व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य, राज्य विद्यूत पारेषण कंपनी, मर्या. मुंबई
१६.विशेष पोलिस महानिरीक्षक, नाशिक परिक्षेत्र , नाशिक
१७.आयुक्त, आदिवासी विकास, म.रा. नाशिक
१८. श्री. बाजीराव जाधव, व्यवस्थापकीय संचालक, म.रा.सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्यादित नाशिक तथा सदस्य सचिव, चौकशी समिती, नाशिक
१९.श्री. सुनिल भोसले , सहसंचालक (वित्त ), महाराष्ट्र राज्य एडस नियंत्रण सोसायटी, वडाळा, मुंबई
२०.महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र -१, मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर,
२१.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२२.जिल्हा कोषागार अधिकारी , नाशिक
२३.सर्व उप सचिव/अवर सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
२४.सर्व कार्यासन अधिकारी, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
२५.निवड नस्ती का-१६